एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ करीता परिवहन विभागातील रुजू उमेदवारांच्या खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमव्हीडी-०६२३/प्र.क्र. २२३/परि-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १९ मार्च, २०२४.

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-१११४/प्र.क्र.८३/१४-१८-ब, दि.०३.११.२०१४.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०६२३/प्र.क्र.४५/सीपीटीपी-ब, दि.१८.०९.२०२३.
४) शासन आदेश, गृह विभाग,क्र.एमव्हीडी-०६२३/प्र.क्र.२२३/परि-४, दि.२३.१०.२०२३.
५) परिवहन आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र.पआका / का८(१) /सीपीटीपी-९ /खातेनिहाय संलग्न प्रशिक्षण / २०२४, जा.क्र.३३४८, दि.१५.०३.२०२४.

**शासन आदेश :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. ३ वरील आदेशान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा- २०२० च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या उमेदवारांना एकत्रित प्रशिक्षण कार्यक्रम-९ साठी प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती दिली आहे. संदर्भ क्र.४ वरील शासन निर्णयान्वये परिवहन विभागातील ०४ उमेदवारांकरीता सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील ४ अधिसंख्य पदे दोन वर्षाच्या कालावधीसाठी निर्माण करण्यात आली आहेत. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम- ९ (सीपीटीपी-९) अंतर्गत दि.२०.०३.२०२४ ते दि.१८.०८.२०२५ या कालावधीसाठी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणाच्या खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यासाठी पाठवावयाचे आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.०३.११.२०१४ मधील मार्गदर्शक सूचना विचारात घेता, सीपीटीपी-९ अंतर्गत दि.२०.०३.२०२४ ते दि.१८.०८.२०२५ या कालावधीसाठी खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यासाठी परिवहन विभागातील परिविक्षाधीन ०४ सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी, गट-अ यांना खालीलप्रमाणे जिल्हा वाटप करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | स्व: जिल्हा | वाटप करण्यात आलेला जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | श्री. सूरज प्रविण पवार | सातारा | बीड |
| २ | श्री. शिवराज शहाजी डोंगरे | सातारा | नागपूर |
| ३ | श्री. राहूल कैलाश जगदाळे | अहमदनगर | पुणे |
| ४ | श्री. अक्षय श्रीकांत येवले | सातारा | नंदुरबार |

३. सदर परिविक्षाधीन उमेदवारांनी त्यांना वाटप करण्यात आलेल्या जिल्ह्यात, जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी दि.२०.०३.२०२४ रोजी न चुकता संबंधित उप प्रादेशिक/प्रादेशिक परिवहन अधिकारी यांच्या कार्यालयात उपस्थित राहण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर उमेदवारांच्या दि.२०.०३.२०२४ ते दि.१८.०८.२०२५ या कालावधीच्या खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्यासाठीच्या प्रशिक्षणाबाबत पुढील आवश्यक कार्यवाही परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांनी करावी.

५. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१९१८३०३५१५२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.19 18:40:03 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२, (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४००१०.
८. संबंधित उप/प्रादेशिक परिवहन कायार्लय.
९. संबंधित उमेदवार (ई-मेल द्वारे)
१०. कक्ष अधिकारी (सीपीटीपी-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती.